खाजगी विमान प्रवास अनुज्ञेय करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांकः प्रवास-1696/प्र.क्र.201/सेवा-5,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 24 डिसेंबर, 1996.

पहा :- (1) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः प्रवास.1689/48/89/सेवा-5, दिनांक 29 ऑगस्ट, 1989.

(2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः प्रवास.1693/159/सेवा-5, दिनांक 7 डिसेंबर,1993.

(3) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः प्रवास.1094/प्र.क्र.196/सेवा-5, दिनांक 12 डिसेंबर. 1994.

(4) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः प्रवास.1095/प्र.क्र.77/सेवा-5, दिनांक 14 सप्टेंबर. 1995.

## शासन निर्णय

उपरोक्त अनुक्रमांक (4) येथील आदेशान्वये मंत्रालयातील प्रशासकीय विभागांचे सचिव व त्या दर्जाच्या अधिका-यांना "संप वगैरे बाबींमुळे सार्वजनिक विमान सेवेची उड्डाणे रद्द झाल्यामुळे किंवा सार्वजनिक विमान सेवेच्या अनुपलब्धतेमुळे मला खाजगी विमान सेवेच्या विमानाने प्रवास करावा लागला" असे प्रमाणपत्र प्रवास देयकाबरोबर सादर करण्याच्या अटीस अधीन राहून खाजगी विमान प्रवासाचे संपूर्ण भाडे अनुज्ञेय ठरविण्यात आले आहे.

2. विमान प्रवास अनुज्ञेय असलेल्या निम्नस्तरावरील अधिका-यांना वरील तरतूद लागू करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासन आता असे आदेश देत आहे की, महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, 1981 च्या परिशिष्ट 2 मध्ये समाविष्ट असलेल्या आणि यापुढे समाविष्ट होणा-या विभाग प्रमुखांना तसेच रु.4100/- व त्याहून अधिक मासिक वेतन घेणारे सर्व शासकीय अधिकारी यांना देखील वर परिच्छेद 1 येथे उल्लेखित अटीच्या अधीन राहून खाजगी विमान प्रवासाचे संपूर्ण भाडे अनुज्ञेय राहील. विभाग प्रमुखांच्या बाबतीत वरील प्रमाणपत्र देण्यास ते स्वतः सक्षम राहतील. मात्र रु.4100/- व त्याहून अधिक मासिक वेतन घेणा-या इतर अधिका-यांच्या बाबतीत असे प्रमाणपत्र त्यांना यथास्थिती संबंधित विभाग प्रमुखांकडून/प्रशासकीय विभागाच्या सचिवांकडून घेणे आवश्यक राहील.

3. सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. वि. लागवणकर,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

महालेखापाल-1 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,

महालेखापाल-1 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-2 (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्रमांक 261, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई, पुणे, नागपूर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-5.

---

* पत्राने.

एच-1086(12,500+10-1-97)-अ.